## सत्यनारायणाच्या व्रताची पूजासामग्री.

हळद, कुंकूं.
अबीर, गुलाल.
कापूर, उद्बत्ती.
फुलें, तुळशी आणि दूर्वा.
आंब्याचे पल्लव.
नारळ.
तांदूळ.
गहूं.
विड्याचीं पानें.
सुपाऱ्या.
मखरास केळी.
फळें केळीं आदि.




मेवामिठाई.
पंचामृताचें साहित्य.
शिऱ्याचें साहित्य.
१ तूप.
२ साखर.
३ दूध.
४ गव्हांचा रवा.
५ केळीं.
सुवर्णाची प्रतिमा.
वस्त्र.
यज्ञोपवीत.
दक्षणेस खुर्दा.
कलश आणि पूर्णपात्र.

श्रीगणेशायनमः ॥ ॥ व्रतीसंक्रांतौपौर्णमास्यांचैकादश्यांयस्मिन्कस्मिन्दिनेवा सायंकालेस्नात्वापूजास्थानमागत्यआसनेउपविश्यआचम्यपवित्रंधृत्वा संकल्पंकुर्यात् ॥ अद्येत्यादिपूर्वोच्चरितएवंगुणविशेषणविशिष्टायांशुभपुण्यतिथौअमुकगोत्रोऽमुकशर्माहं सकलदुरितोपशमसर्वापच्छांतिपूर्वकसकलमनोरथसिद्ध्यर्थंयथासंपादितसामग्र्यागणेशगौरीवरुणदेवतागणपत्यादिचतुष्टयाष्टलोकपालदेवतासूर्यादिनवग्रहदेवताऽऽवाहनपूजनपूर्वकंश्रीसत्यनारायणपूजनंतत्कथाश्रवणंचकरिष्ये ॥ तथाकलशादिपूजांशरीरशुद्ध्यर्थंपुरुषसूक्तन्यासंचकरिष्ये ॥ आसनविध्यादिघंटापूजनांते ॥ अपवित्रःपवित्र इतिपूजाद्रव्याणिसंप्रोक्ष्यनिर्विघ्नतासिद्धये गणपतिंचसंपूज्य । महीद्यौरितिभूमिंस्पृष्ट्वाओषधयइतितंदुलपुंजंकृत्वा । आकलशेष्वितिकलशंसंस्थाप्य । इमंमेगंगेइतिजलं । कांडात्कांडादितिदूर्वाः । अश्वत्थेवइतिपंचपल्लवान् । याःफलिनीरितिफलं । सहिरत्नानीतिपंचरत्नानि । हिरण्यरूप इतिहिरण्यंचप्रक्षिप्य । युवासुवासाइत्यनेनवस्त्रंसमर्प्यतदभावेअक्षतान्क्षिपेत् ॥

ततःपूर्णादर्वीतिपूर्णपात्रंनिधाय ॥ कलशंगंधाक्षतपुष्पैर्भूषयेत् ॥ ततःगणेशादीनांसूर्यादिनवग्रहाणांचतत्तन्मंत्रैरावाहनंकृत्वापूजनंकुर्यात् ॥ ॥ तदित्थं ॥ ॐ गणानांत्वागणपतिंहवामहेकविंकवीनामुपमश्रवस्तमम् ॥ ज्येष्ठराजंब्रह्मणांब्रह्मणस्पतआनःशृण्वन्नूतिभिःसीदसादनं ॥ गणेशायनमः गणेशंआवाहयामि ॥ ॐ गौरीर्मिमायसलिलानितक्षत्येकपदीद्विपदीसाचतुष्पदी ॥ अष्टापदीनवपदीबभूवुषीसहस्राक्षरापरमेव्योमन् ॥ गौर्यैनमःगौरीमा० ॥ ॐ तत्वायामिब्रह्मणावंदमानस्तदाशास्तेयजमानोहविर्भिः ॥ अहेळमानोवरुणेहबोध्युरुशंसमानआयुःप्रमोषीः ॥ वरुणायनमः वरुणमावा० ॥ गणपतिं दुर्गां क्षेत्रपालं वास्तोष्पतिं च आवाह्य ॥ इंद्रं अग्निं यमं निर्ऋतिं वरुणं वायुं सोमं ईशानं चावाह्य सूर्यादीनावाहयेत् ॥ ॐ आकृष्णेनरजसावर्तमानोनिवेशयन्नमृतंमर्त्यंच ॥ हिरण्ययेनसवितारथेनादेवोयातिभुवनानिपश्यन् ॥ १ ॥ सूर्यायनमः सूर्यआवाहयामि ॥ ॐ आप्यायस्वसमेतुतेविश्वतःसोमवृष्ण्यं ॥ भवावाजस्यसंगथे ॥ २ ॥ चंद्रायनमः

चंद्रंआवाहयामि ॥ ॐ अग्निर्मूर्धादिवःककुत्पतिःपृथिव्याअयं ॥ अपांरेतांसिजि
न्वति ॥ ३ ॥ भौमायनमः भौमंआवाह० ॥ ॐ उद्बुध्यध्वंसमनसःसखायःसमग्नि
मिंध्वंबहवःसनीळाः ॥ दधिक्रामग्निमुषसंचदेवीमिंद्रावतोवसेनिह्वयेवः ॥ ४ ॥ बु
धायनमःबुधंआवाह० ॥ ॐ बृहस्पतेअतियदर्योअर्हाद्द्युमद्विभातिक्रतुमज्जनेषु ॥
यद्दीदयच्छवसऋतप्रजाततदस्मासुद्रविणंधेहिचित्रं ॥ ५ ॥ बृहस्पतयेनमःबृहस्प
तिंआवाहयामि ॥ ॐ शुक्रःशुशुक्वाँउषोनजारःपप्रासमीचीदिवोनज्योतिः ॥ ६ ॥
शुक्रायनमः शुक्रमावाहयामि ॥ ॐ शमग्निरग्निभिःकरच्छंनस्तपतुसूर्यः ॥ शंवा
तोवात्वरपाअपस्रिधः ॥ ७ ॥ शनैश्चरायनमः शनैश्चरमावाहयामि ॥ ॐ कया
नश्चित्रआभुवदूतीसदावृधःसखा ॥ कयाशचिष्ठयावृता ॥ ८ ॥ राहवेनमः
राहुंआवाहयामि ॥ ॐ केतुंकृण्वन्नकेतवेपेशोमर्याअपेशसे ॥ समुषद्भिरजाय
थाः ॥ ९ ॥ केतवेनमः केतुंआवाहयामि ॥ तदस्तुमित्रावरुणेत्यनेनगणेशाद्या
वाहितदेवताःसुप्रतिष्ठिताःसंतु इतिप्रतिष्ठाप्य भूर्भुवःस्वः गणेशाद्यावाहितदे

वताभ्योनमः ध्यायामि इत्यादिषोडशोपचारपूजांकुर्यात् ॥ ॥ अथध्यानं ॥ पुष्पंगृहीत्वा ध्यानंकुर्यात् ॥ ध्यायेत्सत्यंगुणातीतंगुणत्रयसमन्वितं ॥ लोकनाथं त्रिलोकेशंकौस्तुभाभरणंहरिम् ॥ १ ॥ नीलवर्णंपीतवासंश्रीवत्सपदभूषितम् ॥ गोविंदंगोकुलानंदंब्रह्माद्यैरपिपूजितम् ॥२॥ इतिध्यानं ॥ ॥ ॐ सहस्रशीर्षा० ॥ आगच्छभगवन्देवस्थानेचात्रस्थिरोभव ॥ यावत्पूजांकरिष्येहंतावत्त्वंसंनिधौ भव ॥ १ ॥ इत्यावाहनं ॥ ॐ पुरुषएवेदं० ॥ नानारत्नसमायुक्तंकार्तस्वरविभूषितम् ॥ आसनंदेवदेवेशप्रीत्यर्थंप्रतिगृह्यतां ॥ २ ॥ इत्यासनं ॥ ॐ एतावानस्य० ॥ नारायणनमस्तेस्तुनरकार्णवतारक ॥ पाद्यंगृहाणदेवेशममसौख्यंविवर्धय ॥ ३॥ इतिपाद्यं ॥ ॐ त्रिपादूर्ध्व० ॥ व्यक्ताव्यक्तस्वरूपायहृषीकपतयेनमः ॥ मया निवेदितोभक्त्याअर्घोयंप्रतिगृह्यताम् ॥४॥ इत्यर्घ्यं ॥ ॐ तस्माद्विराळ० ॥ मंदाकिन्यास्तुयद्वारिसर्वपापहरंशुभं ॥ तदिदंकल्पितंदेवसम्यगाचम्यतांत्वया ॥ ५॥ इत्याचमनं ॥ ॐ यत्पुरुषेण० ॥ स्नानंपंचामृतैर्देवगृहाणपुरुषोत्तम ॥ अनाथना

थसर्वज्ञगीर्वाणप्रणतिप्रिय ॥ ३ ॥ पंचामृतस्नानं ॥ ॐ आप्यायस्व० ॥ इतिप
यःस्नानं ॥ ॐ दधिक्राव्णो० ॥ इतिदधिस्नानं ॥ ॐ घृतंमिमिक्षे० इतिघृतस्ना
नं ॥ ॐ मधुवाता० ॥ इतिमधुस्नानं ॥ ॐ स्वादुःपवस्व० ॥ इतिशर्करास्नानं ॥
इतिपंचामृतस्नानं ॥ ॐ गंधद्वारां० ॥ इतिचंदनोदकस्नानं ॥ ॐ कनिक्रदत्० ॥
इतिमांगलिकस्नानं ॥ सकलपूजार्थेगंधाक्षतपुष्पंस० ॥ पुरुषसूक्तादिभिरन्यैरु
द्रादिभिश्चाभिषेकः ॥ ॐ तंयज्ञं० ॥ वेदसूक्तसमायुक्तेयज्ञसामसमन्विते ॥ सर्व
वर्णप्रदेदेववाससीप्रतिगृह्यताम् ॥ ७ ॥ इतिवस्त्रं ॥ ॐ तस्माद्यज्ञा० ॥ ब्रह्म
विष्णुमहेशैश्चनिर्मितंब्रह्मसूत्रकं ॥ यज्ञोपवीतदानेनप्रीयतांकमलापतिः ॥ ८ ॥
इतियज्ञोपवीतं ॥ ॐ तस्माद्यज्ञात्सर्वहुतऋचः० ॥ श्रीखंडंचंदनंदिव्यंगंधाढ्यंसु
मनोहरं ॥ विलेपनंसुरश्रेष्ठचंदनंप्रतिगृह्यतां ॥ ९ ॥ इतिचंदनं ॥ ॐ अहिरिव
भोगैः० ॥ इतिपरिमलद्रव्याणिसौभाग्यद्रव्याणिच ॥ अलंकारार्थानक्षतांश्चस० ॥
ॐ तस्मादश्वा० ॥ मल्लिकादिसुगंधीनिमालत्यादीनिवैप्रभो ॥ मयाहृतानिपूजा

र्थंपुष्पाणिप्रतिगृह्यतां ॥ १० ॥ इतिपुष्पाणि ॥ ॐयत्पुरुषंव्यदधुः० ॥ वनस्प
तिरसोद्भूतोगंधाढ्योगंधउत्तमः ॥ आघ्रेयःसर्वदेवानांधूपोयंप्रतिगृह्यताम् ॥ ११ ॥
धूपं ॥ ॐब्राह्मणोस्य० ॥ साज्यंचवर्तिसंयुक्तंवह्निनायोजितंमया ॥ दीपंगृहाण
देवेशत्रैलोक्यतिमिरापह ॥ १२ ॥ दीपं ॥ ॐ चंद्रमामनसो० ॥ घृतपक्कहविष्या
न्नंपायसंचसशर्करं ॥ नानाविधंचनैवेद्यंविष्णोमेप्रतिगृह्यताम् ॥ १३ ॥ नैवेद्यं ॥
सर्वपापहरंदिव्यंगांगेयंनिर्मलंजलं ॥ मयाह्याचमनंदत्तंगृह्यतांपुरुषोत्तम ॥ इत्याच
मनं ॥लवंगकर्पूरयुतंतांबूलंसुरपूजितम् ॥प्रीत्यागृहाणदेवेशममसौख्यंविवर्धय ॥
इतितांबूलं ॥ इदंफलंमयादेवस्थापितंपुरतस्तव ॥ तेनमेसुफलावाप्तिर्भवेज्जन्मनि
जन्मनि ॥ इतिफलं ॥ ॐ श्रियेजातः० ॥ चतुर्वर्तिसमायुक्तंघृतेनचसुपूरितम् ॥नी
राजनेनसंतुष्टोभवत्वेवजगत्पतिः॥इतिनीराजनं ॥ कर्पूरदीपंसुमनोहरंप्रभोददा
मितेदेववरप्रसीदभो ॥ पापान्धकारंत्वरितंनिवारयप्रज्ञानदीपंमनसिप्रदीपय ॥
इतिकर्पूरार्तिक्यं ॥ ॐ नाभ्यांआसी० ॥ नमोस्त्वनंतायसहस्रमूर्तयेसहस्रपादा

क्षिशिरोरुबाहवे ॥ सहस्रनाम्नेपुरुषायशाश्वतेसहस्रकोटीयुगधारिणेनमः ॥ १४ ॥
इतिनमस्कारः ॥ ॐसप्तास्यासन्० ॥ यानिकानिचपापानिजन्मांतरकृतानिच ॥
तानितानिविनश्यंतिप्रदक्षिणपदेपदे ॥ १५ ॥ इतिप्रदक्षिणाः ॥ ॐयज्ञेनयज्ञ० ॥
इतिअन्यैर्मंत्रैश्चपुष्पांजलिः ॥ १६ ॥ अथसंप्रार्थ्यस्तुवीत ॥ यन्मयाभक्तियुक्तेन
पत्रंपुष्पंफलंजलं ॥ निवेदितंचनैवेद्यंतद्गृहाणानुकंपया ॥१ ॥ मंत्रहीनंक्रियाहीनं
भक्तिहीनंजनार्दन ॥ यत्पूजितंमयादेवपरिपूर्णंतदस्तुमे ॥२॥ अमोघंपुंडरीकाक्षं
नृसिंहंदैत्यसूदनम् ॥ हृषीकेशंजगन्नाथंवागीशंवरदायकं ॥ ३ ॥ गुणत्रयंगुणाती
तंगोविंदंगरुडध्वजं ॥ जनार्दनंजनातीतंजानकीवल्लभंहरिं ॥४॥ प्रणमामिसदा
भक्त्यानारायणमतःपरम् ॥ दुर्गमेविषमेघोरेशत्रुभिःपरिपीडिते ॥ ५ ॥ निस्तार
यस्वसर्वेषुतथानिष्टभयेषुच ॥ नामान्येतानिसंकीर्त्यईप्सितंफलमाप्नुयात् ॥ ६ ॥
सत्यनारायणंदेवंवंदेहंकामदंप्रभुं ॥ लीलयावितितंविश्वंयेनतस्मैनमोनमः ॥ ७ ॥
इतिप्रार्थना ॥ अनेनपू०श्रीसत्यनारायणःप्रीयतां॥ इतिसत्यनारायणपूजाविधिः॥

श्रीगणेशाय नमः ॥ सत्यनारायणकथार्थप्रारंभः ॥ नैमिषारण्यांत राहणारे शौनकादिक सर्व ऋषि पुराणें सांगणारा जो सूत त्यास एकेसमयीं प्रश्न करिते झाले, कीं ॥१॥ हे महामुने, इच्छितफल कोणत्या व्रतानें किंवा तपानें प्राप्त होईल तें सर्व ऐकण्यास आह्मी इच्छितों, कृपा करून सांगा ॥ २ ॥ सूत सांगतात हे ऋषिहो, पूर्वी नारदानें श्रीभगवान् जो विष्णु

अथकथा ॥ श्रीगणेशायनमः ॥ एकदानैमिषारण्येऋषयःशौनकादयः ॥
पप्रच्छुर्मुनयःसर्वेसूतंपौराणिकंखलु ॥ १ ॥ ऋषयऊचुः ॥ व्रतेनतपसाकिं
वाप्राप्यतेवांछितंफलं ॥ तत्सर्वंश्रोतुमिच्छामःकथयस्वमहामुने ॥ २ ॥
सूत उवाच ॥ नारदेनैवसंपृष्टोभगवान्कमलापतिः ॥ सुरर्षयेयथैवाहत
च्छृणुध्वंसमाहिताः ॥ ३ ॥ एकदानारदोयोगीपरानुग्रहकांक्षया ॥
पर्यटन्विविधान्लोकान्मर्त्यलोकमुपागतः ॥ ४ ॥ ॥ ॥

त्यास हाच प्रश्न केला, त्याकालीं विष्णूनें नारदास जें सांगितलें तेंच मी तुह्मांस सांगतों, स्वस्थ चित्तानें ऐका ॥ ३ ॥ एके समयीं नारदयोगी जनांवर दया करावी या हेतूनें अनेक लोकांत फिरत असतां मनुष्यलोकीं प्राप्त झाले ॥ ४ ॥

नंतर मनुष्यलोकीं सर्व जन नानाप्रकारच्या योनींत जन्म घेऊन आपापल्या कर्मानुसार अनेक प्रकारचीं दुःखें भोगीत आहेत असें पाहून ॥५॥ कोणत्या उपायानें याचीं दुःखें खचित नाश पावतील, हा विचार मनांत आणून नारद त्याकालीं विष्णुलोकीं गमन करिते झाले ॥ ६ ॥

ततोदृष्ट्वाजनान्सर्वान्नानाक्लेशसमन्वितान् ॥ नानायोनिसमुत्पन्नान्क्लिश्यमानान्स्वकर्मभिः ॥५॥ केनोपायेनचैतेषांदुःखनाशोभवेद्ध्रुवम् ॥ इति संचिंत्यमनसाविष्णुलोकंगतस्तदा ॥ ६ ॥ तत्रनारायणंदेवंशुक्लवर्णंचतुर्भुजं ॥ शंखचक्रगदापद्मवनमालाविभूषितम् ॥ ७ ॥ दृष्ट्वातंदेवदेवेशं स्तोतुंसमुपचक्रमे ॥ ॥ नारद उवाच ॥ नमोवाङ्मनसातीतरूपायानंतशक्तये ॥ ८ ॥ आदिमध्यांतहीनायनिर्गुणायगुणात्मने ॥ सर्वेषामादिभूतायभक्तानामार्तिनाशिने ॥ ९ ॥ ॥

तेथें शुक्लवर्ण, चतुर्भुज, शंख, चक्र, गदा, पद्म आणि वनमाला यांनीं सुशोभित देवांचाही देव असा जो परमेश्वर त्या नारायणाला अवलोकन करून नारद त्याची स्तुति करण्यास आरंभ करिता झाला. तो ह्मणाला, ज्याचें रूप वाणी आणि मन यांला अगोचर, ज्याची शक्ति अनंत,

जो आदि, मध्य व अंत यांनीं विरहित, तसेंच जो निर्गुण असून सृष्टि, स्थिति आणि प्रलय करण्यासाठीं सत्व, रज आणि तम ह्या गुणांचा अंगीकार करितो, जो सर्वांचा आदिकारण; जो भक्तांच्या दुःखाचा नाश करणारा अशा नारायणास नमस्कार असो ॥ ७ ॥ ८ ॥ ९ ॥ या प्रकारें केलेली स्तुति ऐकून, भगवान् विष्णु नारदाप्रत बोलते झालेः–हे भाग्यशाली

श्रुत्वास्तोत्रंततोविष्णुर्नारदंप्रत्यभाषत ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ किमर्थमागतोसित्वंकिंतेमनसिवर्तते ॥ १० ॥ कथयस्वमहाभागतत्सर्वंकथयामिते ॥ नारदउवाच ॥ मर्त्यलोकेजनाःसर्वेनानाक्लेशसमन्विताः ॥ नानायोनिसमुत्पन्नाःपच्यंतेपापकर्मभिः ॥ ११ ॥ तत्कथंशमयेन्नाथलघूपायेनतद्वद ॥ श्रोतुमिच्छामितत्सर्वंकृपास्तियदितेमयि ॥ १२ ॥ ॥

नारदा, तूं कोणत्या कारणास्तव आलास? तुझ्या मनांत काय हेतु आहे? ॥१०॥ तें सर्व मला सांग; मी त्याचें प्रत्युत्तर देतों असें नारायणाचें भाषण ऐकून नारद बोलतो-हे देवा, मृत्युलोकाचे ठायीं सर्व लोक अनेक प्रकारचीं दुःखें भोगीत होत्साते अनेक योनींत उत्पन्न होऊन पापकर्मांनीं दुःखांत पडले आहेत ॥ ११ ॥ याजकरितां हे प्रभो, जर मजवर आपली कृपा

आहे तर, थोड्या उपायानें सर्व लोकांचे दुःखाचा कसा नाश होईल तें सर्व मला सांग. मी तें सर्व ऐकण्यास इच्छीत आहें. ॥ १२ ॥ नारदाचें भाषण ऐकून भगवान् विष्णु सांगतात—हे वत्सा नारदा, लोकांवर कृपा करावी अशा इच्छेनें तूं प्रश्न केलास, ह्मणून तुझा हा प्रश्न फार उत्तम आहे. आतां जें केलें असतां मनुष्य सर्व दुःखांपासून मुक्त होईल

श्रीभगवानुवाच ॥ ॥ साधुपृष्टंत्वयावत्सलोकानुग्रहकांक्षया ॥ यत्कृत्वा मुच्यतेमोहात्तच्छृणुष्ववदामिते ॥ १३ ॥ व्रतमस्तिमहत्पुण्यंस्वर्गेमर्त्येचदुर्लभं ॥ तवस्नेहान्मयावत्सप्रकाशःक्रियतेधुना ॥१४ ॥ सत्यनारायणस्यैवंव्रतंसम्यग्विधानतः ॥ कृत्वासद्यःसुखंभुक्त्वापरत्रमोक्षमाप्नुयात् ॥१५॥

तें तुला सांगतों. तूं श्रवण कर ॥ १३ ॥ वत्सा नारदा, स्वर्गलोकीं व मृत्युलोकीं महापुण्यकारक व दुर्लभ असें एक व्रत आहे तें मी प्रस्तुत कालीं तुझ्या प्रीतीसाठीं सांगतों ॥ ॥ १४ ॥ सत्यनारायणाचें व्रत उत्तम प्रकारेंकरून विधिपूर्वक केलें असतां मनुष्य ह्या लोकीं सतत सुख भोगून परलोकीं मोक्षपदास प्राप्त होईल ॥ १५ ॥

अशाप्रकारचें भगवंताचें भाषण ऐकून नारद ऋषि पुनः प्रश्न करिते झाले कीं, नारायणा, या व्रताचें फल काय, ह्याचें विधान कसें, आणि हें व्रत पूर्वीं कोणीं केलें होतें ॥ १६ ॥ आणि हें व्रत कोणत्या कालीं करावें हें सर्व मला विस्तारपूर्वक सांगा, असा नारदाचा प्रश्न ऐकून भगवान् सांगतात—हें व्रत दुःखशोकादिकांचें शमन करणारें असून धनधान्याची वृद्धि करणारें

तच्छ्रुत्वाभगवद्वाक्यंनारदोमुनिरब्रवीत् ॥ ॥ नारदउवाच ॥ किंफलं किंविधानंचकृतंकेनैवतद्व्रतम् ॥ १६ ॥ तत्सर्वंविस्तराद्ब्रूहिकदाकार्यंहितद्व्रतम् ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ दुःखशोकादिशमनंधनधान्यप्रवर्धनम् ॥ १७ ॥ सौभाग्यसंततिकरंसर्वत्रविजयप्रदम् ॥ यस्मिन्कस्मिन्दिनेमर्त्योभक्तिश्रद्धासमन्वितः ॥१८॥ सत्यनारायणंदेवंयजेच्चैवनिशामुखे ॥ ब्राह्मणैर्बांधवैश्चैवसहितोधर्मतत्परः ॥ १९ ॥ ॥

आहे ॥१७॥ तसेंच हें व्रत सौभाग्य व संतति देणारें व सर्व कार्यांत विजय देणारें आहे. कोणत्याही दिवशीं भक्ति व श्रद्धा यांनीं युक्त मनुष्य असेल॥१८॥ तेव्हां आपले बंधुवर्ग व ब्राह्मण ह्यांसहवर्तमान धर्मतत्पर होऊन त्यानें प्रदोषकालीं सत्यनारायणाची पूजा करावी ॥ १९ ॥

भक्तियुक्त होत्साता उत्तम प्रकारचा सपाद (सव्वाशेर, सव्वापायली इत्यादि) भक्ष्य नैवेद्य नारायणास अर्पण करावा. तो केळीं, तूप, दूध आणि गव्हांचा रवा यांनीं केलेला असावा ॥ २० ॥ गव्हांचा रवा न मिळेल तर तांदुळांचा रवा घ्यावा. साखर न मिळेल तर गूळ इत्यादि सर्व पदार्थ प्रत्येक सपाद ह्मणजे सव्वा ह्या मानानें मिश्रण करून तो केलेला

नैवेद्यंभक्तितोदद्यात्सपादंभक्ष्यमुत्तमं ॥ रंभाफलंघृतंक्षीरंगोधूमस्यचचूर्णकम् ॥२०॥ अभावेशालिचूर्णंवाशर्करांवागुडंतथा ॥ सपादंसर्वभक्ष्याणि चैकीकृत्यनिवेदयेत् ॥ २१ ॥ विप्रायदक्षिणांदद्यात्कथांश्रुत्वाजनैःसह ॥ ततश्चबंधुभिःसार्धंविप्रांश्चप्रतिभोजयेत् ॥२२॥ सपादंभक्षयेद्भक्त्यानृत्यगीतादिकंचरेत् ॥ ततश्चस्वगृहंगच्छेत्सत्यनारायणंस्मरन् ॥ २३ ॥ ॥

नैवेद्य अर्पण करावा ॥ २१ ॥ आपले आप्तजन व मित्रमंडळी यांसह कथा श्रवण करून ब्राह्मणास दक्षिणा द्यावी. बंधुवर्ग व ब्राह्मण ह्यांस भोजन घालावें आणि आपण प्रसाद भक्षण करावा. नृत्यगायन करावें. याप्रमाणें देवालयादि पवित्र स्थानीं हें व्रत करून नंतर सत्यनारायणाचें स्मरण करीत करीत घरीं जावें ॥ २२ ॥ २३ ॥

या प्रकारेंकरून व्रत केलें असता मनुष्यांचे मनोरथ निश्चयेंकरून परिपूर्ण होतील. ह्या कलियुगांत विशेषेंकरून भूतलावर हाच अल्प उपाय आहे ॥ २४ ॥ इति श्रीस्कंदपुराणे रेवाखंडे श्रीसत्यनारायणकथामहाराष्ट्रभाषाटीकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ॥ भगवान् सांगतात—हे नारदा, पूर्वीं हें व्रत कोणीं केलें तें तुला सांगतों ऐक. पूर्वीं रम्य अशा

एवंकृतेमनुष्याणांवांछासिद्धिर्भवेद्ध्रुवम् ॥ विशेषतःकलियुगेलघूपायोस्तिभूतले ॥ २४ ॥ इतिश्रीस्कंदपुराणेरेवाखंडेसत्यनारायणकथायांप्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ अथान्यत्संप्रवक्ष्यामिकृतंयेनपुराद्विज ॥ कश्चित्काशीपुरेरम्येह्यासीद्विप्रोऽतिनिर्धनः ॥ १ ॥ क्षुत्तृड्भ्यांव्याकुलोभूत्वानित्यंबभ्रामभूतले ॥ दुःखितंब्राह्मणंदृष्ट्वाभगवान्ब्राह्मणप्रियः ॥ २ ॥ ॥ ॥ ॥

काशीनगरांत कोणी एक अति दरिद्री ब्राह्मण रहात असे ॥ १ ॥ तो क्षुधा आणि तृषा यांनीं व्याकुल होऊन नित्य पृथ्वीतलावर फिरत असे. तेव्हां ब्राह्मणांवर कृपा करणारा भगवान् त्या दुःखित अशा ब्राह्मणास पाहून ॥ २ ॥

स्वतः वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन त्या ब्राह्मणास परमादरानें प्रश्न करिता झाला कीं, हे ब्राह्मणा, तूं अति दुःखित होऊन नित्य ह्या पृथ्वीतलावर कशाकरितां फिरतोस? ॥ ३ ॥ तें सर्व मी श्रवण करूं इच्छितों, तर तें तूं मला सांग. याप्रमाणें त्या वृद्ध ब्राह्मणाचें भाषण ऐकून तो दरिद्री ब्राह्मण त्यास ह्मणतो–मी अति दरिद्री ब्राह्मण आहें. भिक्षेक-

वृद्धब्राह्मणरूपस्तंपप्रच्छद्विजमादरात् ॥ किमर्थंभ्रमसेविप्रमहींनित्यंसुदुःखितः ॥ ३ ॥ तत्सर्वंश्रोतुमिच्छामिकथ्यतांद्विजसत्तम ॥ ॥ ब्राह्मण उवाच ॥ ॥ ब्राह्मणोऽतिदरिद्रोहंभिक्षार्थंवैभ्रमेमहीम् ॥ ४ ॥ उपायं यदिजानासिकृपयाकथयप्रभो ॥ ॥ वृद्धब्राह्मणउवाच ॥ सत्यनारायणोविष्णुर्वांछितार्थफलप्रदः ॥ ५ ॥ ॥ ॥

रितां पृथ्वीवर फिरत असतों ॥ ४ ॥ हे प्रभो! जर कांहीं दारिद्र्यनाशक असा एकादा उपाय आपण जाणत असाल तर तो कृपा करून मला सांगा. असें त्या दरिद्री ब्राह्मणाचें भाषण ऐकून वृद्ध ब्राह्मणरूपी भगवान् ह्मणतात–हे ब्राह्मणा, सत्यनारायण विष्णु सर्वांस इच्छित फल देणारा आहे ॥ ५ ॥

त्याचें पूजनरूपी जें उत्तम व्रत तें तूं कर. तें व्रत केलें असतां मनुष्य सर्व दुःखापासून मुक्त होतो ॥ ६ ॥ तसेंच त्या व्रताचें विधानही त्या ब्राह्मणास सांगून वृद्ध ब्राह्मणरूपी सत्यनारायण तेथेंच गुप्त झाले ॥ ७ ॥ जें व्रत त्या वृद्ध ब्राह्मणानें मला सांगितलें तें मी

तस्यत्वंपूजनंविप्रकुरुष्वव्रतमुत्तमम् ॥ यत्कृत्वासर्वदुःखेभ्योमुक्तोभवति मानवः ॥ ६ ॥ विधानंचव्रतस्यापिविप्रायाभाष्ययत्नतः ॥ सत्यनाराय णोवृद्धस्तत्रैवांतरधीयत ॥ ७ ॥ तद्व्रतंसंकरिष्यामियदुक्तंब्राह्मणेनवै ॥ इतिसंचिंत्यविप्रोऽसौरात्रौनिद्रांनलब्धवान् ॥ ८ ॥ ततःप्रातःसमुत्थाय सत्यनारायणव्रतम् ॥ करिष्यइतिसंकल्प्यभिक्षार्थमगमद्द्विजः ॥ ९ ॥

खचीत करीन, असा त्या दरिद्री ब्राह्मणास ध्यास लागल्यामुळें त्या रात्रीं त्यास निद्राही लागली नाहीं ॥ ८ ॥ नंतर तो ब्राह्मण प्रातःकालीं उठून आज मी सत्यनारायणाचें पूजन करीन असा आपले मनांत संकल्प करून भिक्षेस गेला ॥ ९ ॥

त्या दिवशीं त्या ब्राह्मणास पुष्कळ द्रव्य मिळालें. त्या द्रव्यानें सर्व तयारी करून आपल्या बंधुजनांसह सत्यनारायणाचें व्रत करिता झाला ॥ १० ॥ तो श्रेष्ठ ब्राह्मण ह्या व्रताच्या प्रभावानें सर्व दुःखांपासून मुक्त होऊन सर्व संपत्तींनीं युक्त असा झाला. ॥११॥ त्या दिवसा-पासून तो ब्राह्मण प्रत्येक महिन्यास हें व्रत करूं लागला. याप्रमाणें सत्यनारायणाचें व्रत

तस्मिन्नेवदिनेविप्रःप्रचुरंद्रव्यमाप्तवान् ॥ तेनैवबंधुभिःसार्धंसत्यस्यव्रतमा
चरत् ॥ १० ॥ सर्वदुःखविनिर्मुक्तःसर्वसंपत्समन्वितः ॥ बभूवसद्विजःश्रे
ष्ठोव्रतस्यास्यप्रभावतः ॥ ११ ॥ ततःप्रभृतिकालंचमासिमासिव्रतंकृतं ॥
एवंनारायणस्येदंव्रतंकृत्वाद्विजोत्तमः ॥ सर्वपापविनिर्मुक्तोदुर्लभंमोक्ष
माप्तवान् ॥ १२ ॥ व्रतमस्ययदाविप्रपृथिव्यांसंकरिष्यति ॥ तदैवसर्वं
दुःखंचमनुजस्यविनश्यति ॥ १३ ॥ ॥ ॥

करून तो सर्व पापांपासून मुक्त होऊन दुर्लभ अशा मोक्षाप्रत पावता झाला ॥ १२ ॥ सूत ह्मणतात, हे ऋषी हो, पृथ्वीवर जेव्हां मनुष्य ह्या सत्यनारायणाचें व्रत करील तेव्हांच त्याचें सर्व दुःख नाशाप्रत पावेल ॥ १३ ॥

हे ऋषी हो, याप्रमाणें नारायणानें नारदास जें सत्यनाराणाचें व्रत सांगितलें तेंच मीं तुह्मांस सांगितलें, आतां आणखी काय सांगूं ? ॥ १४ ॥ शौनकादि ऋषि पुनः प्रश्न करितात—हे सूता ! त्या ब्राह्मणापासून हें व्रत कोणीं ऐकिलें आणि त्याप्रमाणें कोणीं आचरिलें तें सर्व ऐकण्यास आह्मी इच्छीत आहों, याविषयीं आह्मांस बहुत भक्ति उत्पन्न झाली आहे ॥ १५ ॥

एवंनारायणेनोक्तंनारदायमहात्मने ॥ मयातत्कथितंविप्राः किमन्यत्कथयामिवः ॥ १४ ॥ ऋषयऊचुः ॥ ॥ तस्माद्विप्राच्छ्रुतंकेनपृथिव्यांचरितंमुने ॥ तत्सर्वंश्रोतुमिच्छामःश्रद्धास्माकंप्रजायते ॥ १५ ॥ ॥ सूतउवाच ॥ ॥ शृणुध्वंमुनयःसर्वेव्रतंयेनकृतंभुवि ॥ एकदासद्विजवरोयथाविभवविस्तरैः ॥ १६ ॥ बंधुभिःस्वजनैःसार्धंव्रतंकर्तुंसमुद्यतः ॥ एतस्मिन्नंतरेकालेकाष्ठक्रेतासमागमत् ॥ १७ ॥ ॥ ॥

ऋषींचें असें भाषण ऐकून सूत ह्मणतात, हे ऋषी हो, हें व्रत पृथ्वीतलावर कोणीं केलें तें ऐका. कोणे एके समयीं तो ब्राह्मणश्रेष्ठ आपल्या ऐश्वर्यानुरूप आपल्या बंधुजनांसह व्रत करूं लागला. इतक्यांत एक लांकडें विकणारा तेथें प्राप्त झाला ॥ १६ ॥ १७ ॥

तो तहानेनें पीडित झालेला असल्यामुळें मस्तकावरील मोळी बाहेर ठेवून त्या ब्राह्मणाच्या घ-रांत गेला, तेव्हां तेथें तो ब्राह्मण व्रत करीत आहे असें पाहून ॥१८॥ त्या ब्राह्मणास नमस्कार करून विचारूं लागला कीं, महाराज! आपण हें काय करीत आहां, आणि हें केल्यानें काय फळ प्राप्त होतें, तें मला सविस्तर सांगा ॥१९॥ त्याचें भाषण ऐकून ब्राह्मण त्याला ह्मणाला—हें

बहिःकाष्ठंचसंस्थाप्यविप्रस्यगृहमाययौ ॥ तृष्णयापीडितात्माचदृष्ट्वाविप्रंकृतव्रतम् ॥१८॥ प्रणिपत्यद्विजंप्राहकिमिदंक्रियतेत्वया ॥ कृतेकिंफलमाप्नोतिविस्तराद्वदमेप्रभो ॥ १९ ॥ ॥ विप्रउवाच ॥ सत्यनारायणस्येदंव्रतंसर्वेप्सितप्रदम् ॥ तस्यप्रसादान्मेसर्वंधनधान्यादिकंमहत् ॥२०॥ तस्मादेतद्व्रतंज्ञात्वाकाष्ठक्रेतातिहर्षितः ॥ पपौजलंप्रसादंचभुक्त्वासनगरंययौ ॥ २१ ॥

सत्यनारायणाचें व्रत सर्वांचे मनोरथ पूर्ण करणारें आहे. आणि तेंच मी करीत आहें, ह्या व्रताच्या प्रभावानें हें सर्व विपुल धनधान्यादि मला प्राप्त झालें. ॥२० ॥ नंतर त्या ब्राह्मणा-पासून सर्व व्रतविधि समजून घेऊन तो लांकडें विकणारा अति आनंदित होत्साता प्रसाद-भक्षण व जलप्राशन करून त्या शहरांत मोळी विकण्याकरितां चालता झाला ॥ २१ ॥

तो मोळी विकण्याकरितां चालला असता मनात सत्यनारायण देवाचें चिंतन करूं लागला. तो आपल्या मनांत ह्मणाला कीं आज ह्या गांवांत ही मोळी विकून जें द्रव्य मिळेल ॥ २२ ॥ त्या द्रव्यानें सत्यनारायणाचें उत्तम व्रत करीन ॥ २३ ॥ नंतर त्या सुंदर नगरींत ज्या ठिकाणीं श्रीमान् लोक रहात होते तेथें तो गेला. त्या दिवशीं त्यास दुप्पट धन प्राप्त झालें

सत्यनारायणंदेवंमनसाइत्यचिंतयत् ॥ काष्ठंविक्रयतोग्रामेप्राप्यतेचाद्यय द्धनं ॥ २२ ॥ तेनैवसत्यदेवस्यकरिष्येव्रतमुत्तमम् ॥ इतिसंचिंत्यमनसा काष्ठंधृत्वातुमस्तके ॥ २३ ॥ जगामनगरेरम्येधनिनांयत्रसंस्थितिः ॥ तद्दिनेकाष्ठमूल्यंचद्विगुणंप्राप्तवानसौ ॥२४॥ ततःप्रसन्नहृदयःसुपक्वंकद लीफलं ॥ शर्कराघृतदुग्धंचगोधूमस्यचचूर्णकं ॥ २५ ॥ कृत्वैकत्रसपादं चगृहीत्वास्वगृहंययौ ॥ ततोबंधून्समाहूयचकारविधिनाव्रतम् ॥२६॥

॥ २४ ॥ तेणेंकरून आनंदित होत्साता उत्तम पिकलेलीं केळीं, साखर, तूप, दूध आणि गव्हांचा रवा ॥ २५ ॥ हे सर्व पदार्थ सव्वापट प्रमाणानें घेऊन आपल्या घरीं आला. नंतर आपल्या बंधुजनांस बोलावून त्यांसह यथाविधि व्रत करिता झाला ॥ २६ ॥

त्या व्रताच्या प्रभावानें तो लांकडें विकणारा धनधान्य व पुत्र यांनीं युक्त होत्साता ह्या लोकीं सुख भोगून अंतकाळीं सत्यलोकाप्रत जाता झाला ॥२७॥ इति श्रीसत्य० महाराष्ट्रभाषाटी-कायां द्वितीयोऽध्यायः ॥२॥ सूत ह्मणतात—ऋषिश्रेष्ठ हो, ह्या व्रताविषयीं आणखी एक कथा सांगतों, श्रवण करा, पूर्वीं पृथ्वीपति उल्कामुख नांवाचा एक प्रसिद्ध राजा होता ॥ १ ॥ तो

तद्व्रतस्यप्रभावेनधनपुत्रान्वितोभवत् ॥ इहलोकेसुखंभुक्त्वाचांतेसत्यपुरं ययौ ॥ २७ ॥ इतिश्रीस्कंदपुराणेरेवाखंडेसत्यनारायणकथायांद्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ सूतउवाच ॥ पुनरग्रेप्रवक्ष्यामिशृणुध्वंमुनिसत्तमाः ॥ पुराचोल्कामुखोनामनृपश्चासीन्महीपतिः॥१॥ जितेंद्रियःसत्यवादीययौ देवालयंप्रति॥ दिनेदिनेधनंदत्वाद्विजान्संतोषयन्सुधीः ॥२॥ भार्यातस्य प्रमुग्धाचसरोजवदनासती ॥ भद्रशीलानदीतीरेसत्यस्यव्रतमाचरत्॥३॥

जितेन्द्रिय, सत्यभाषण करणारा आणि उत्तम बुद्धिवान् होता. तो प्रतिदिवशीं देवालयांत दर्शनास जात असे, व ब्राह्मणांस द्रव्य देऊन संतोषवीत असे ॥ २॥ त्याची प्रतिव्रता स्त्री भद्रशीला कमलवदना अशी अत्यंत सुंदर होती. तो राजा एके दिवशीं नदीतीराचे ठायीं स्त्रीस-

हवर्तमान सत्यनारायणाचें व्रत करीत होता ॥३॥ त्या समयीं कोणी एक साधु नांवाचा वाणी व्यापाराकरितां बहुत प्रकारचीं द्रव्यें घेऊन तेथें प्राप्त झाला ॥४॥ त्या नदीच्या तीरीं नौका ठेवून तो साधुवाणी त्या राजाच्या समीप गेला आणि राजा व्रत करीत आहे असें पाहून मोठ्या नम्रतेनें त्यानें त्यास विचारिलें ॥ ५ ॥ हे राजन्, भक्तियुक्त अंतःकरणानें हें आपण काय

एतस्मिन्नंतरेतत्रसाधुरेकःसमागतः ॥ वाणिज्यार्थंबहुधनैरनेकैःपरिपूरितः ॥ ४ ॥ नावंसंस्थाप्यतत्तीरेजगामनृपतिंप्रति ॥ दृष्ट्वासव्रतिनंभूपंपप्रच्छविनयान्वितः ॥ ५ ॥ ॥ साधुरुवाच ॥ ॥ किमिदंकुरुषे राजन्भक्तियुक्तेनचेतसा ॥ प्रकाशंकुरुतत्सर्वंश्रोतुमिच्छामिसांप्रतम् ॥ ॥ ६ ॥ ॥ राजोवाच ॥ पूजनंक्रियतेसाधोविष्णोरतुलतेजसः ॥ व्रतंचस्वजनैःसार्धंपुत्राद्यावाप्तिकाम्यया ॥ ७ ॥ ॥ ॥

करीत आहां, तें सर्व सांप्रतकाळीं मीं ऐकण्यास इच्छितों; करितां मला कथन करा ॥ ६ ॥ अशा प्रकारचें त्या वाण्याचें भाषण ऐकून राजा सांगतो-हे साधो, अनुपम आहे तेज ज्याचें अशा विष्णूचें पूजन आणि व्रत मी आपल्या आप्तजनांसह पुत्रादिकांच्या इच्छेनें करीत आहें ॥७॥

राजाचें असें भाषण ऐकून तो साधुवाणी नम्रतेनें पुनः विचारिता झाला, हे राजन्, हें सर्व व्रत मला विस्तारेंकरून सांगा आपण जसें सांगाल तसें मी करीन ॥ ८ ॥ मलाही संतति नाहीं ती या व्रतापासून खचित होईल, असें बोलून व व्रताचा सर्व विधि श्रवण करून व्यापारापासून निवृत्त होऊन आनंदानें तो स्वगृहीं आला ॥ ९ ॥ आणि हें संतति देणारें

भूपस्यवचनंश्रुत्वासाधुःप्रोवाचसादरम् ॥सर्वंकथयमेराजन्करिष्येऽहंतवोदितम् ॥८॥ ममापिसंततिर्नास्तिएतस्माज्जायतेध्रुवम् ॥ ततोनिवृत्यवाणिज्यात्सानंदोगृहमागतः ॥९॥ भार्यायैकथितंसर्वंव्रतंसंततिदायकम् ॥ तदाव्रतंकरिष्यामियदामेसंततिर्भवेत् ॥ १० ॥ इतिलीलावतींप्राहपत्नींसाधुःससत्तमः ॥ एकस्मिन्दिवसेतस्यभार्यालीलावतीसती ॥ ११ ॥

व्रत सर्व विधियुक्त आपल्या स्त्रीस त्यानें सांगितलें आणि नवसही केला कीं जेव्हां मला संतति प्राप्त होईल तेव्हां मी सत्यनारायणाचें व्रत करीन ॥१०॥ या प्रकारें उत्तम शीलसंपन्न तो साधुवाणी आपल्या लीलावतीनामक स्त्रीप्रत सांगता झाला. नंतर कोणे एके दिवशीं त्या साधूची धर्मपरायण साध्वी स्त्री लीलावती आनंदयुक्त अंतःकरणानें भर्त्याशीं रममाण

असतां सत्यनारायणाच्या कृपेनें गर्भवती झाली ॥ ११॥ १२॥ नंतर तिला नऊ महिने पूर्ण होतांच एक कन्यारत्न झालें, ती कन्या प्रतिदिवशीं शुक्लपक्षींच्या चंद्राप्रमाणें वाढूं लागली ॥१३॥ ह्मणून त्या कन्येचें त्यानें कलावती असें नांव ठेविलें, नंतर एके दिवशीं लीलावती

भर्तृयुक्तानंदचित्ताभवद्धर्मपरायणा ॥ गर्भिणीसाभवत्तस्यभार्यासत्यप्रसादतः ॥ १२ ॥ दशमेमासिवैतस्याःकन्यारत्नमजायत ॥ दिनेदिनेसा ववृधेशुक्लपक्षेयथाशशी ॥१३॥ नाम्नाकलावतीचेतितन्नामकरणंकृतम् ॥ ततोलीलावतीप्राहस्वामिनंमधुरंवचः ॥ १४ ॥ नकरोषिकिमर्थंवैपुरा संकल्पितंव्रतम् ॥ ॥ साधुरुवाच ॥ विवाहसमयेत्वस्याःकरिष्यामि व्रतंप्रिये ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥

आपल्या पतीजवळ मधुर भाषण करिती झाली ॥ १४ ॥ हे प्राणनाथ! आपण पूर्वीं नवस केलेलें व्रत कां करीत नाहीं! स्त्रीचें भाषण ऐकून साधुवाणी समाधानपूर्वक तिला बोलला, प्रिये! ह्या कन्येचे विवाहाचे वेळीं मी सत्यनारायणाचें व्रत करीन ॥ १५ ॥

या प्रकारें स्त्रीचें समाधान करून तो साधु वाणी कांहीं व्यापाराकरितां दुसऱ्या नगरास गेला. ती कलावती नामक कन्या आपल्या पित्याच्या घरीं वाढती झाली ॥ १६ ॥ कांहीं वर्षांनीं तो धर्मज्ञ साधु वाणी आपली कन्या विवाहास योग्य झाली आहे असें पाहून नगरांत आपल्या मित्रांसह विचार करून त्वरेनें दूत पाठविता झाला ॥ १७ ॥ त्या समयीं साधूनें त्या दूतास

इतिभार्यांसमाश्वास्यजगामनगरंप्रति ॥ ततःकलावतीकन्यावव्रृधेपितृवेश्मनि ॥१६॥ दृष्ट्वाकन्यांततःसाधुर्नगरेसखिभिःसह ॥ मंत्रयित्वाद्रुतंदूतंप्रेषयामासधर्मवित् ॥ १७ ॥ विवाहार्थंचकन्यायावरंश्रेष्ठंविचारय ॥ तेनाज्ञप्तश्चदूतोऽसौकांचनंनगरंययौ ॥ १८ ॥ तस्मादेकंवणिक्पुत्रंसमादायाऽऽगतोहिसः ॥ दृष्ट्वातुसुंदरंबालंवणिक्पुत्रंगुणान्वितम् ॥ १९ ॥ ॥

असें सांगितलें कीं, कन्येला योग्य असा एक वर पहा. अशी साधूची आज्ञा ग्रहण करून तो दूत कांचननामक नगरास गेला ॥ १८ ॥ नंतर तो दूत तेथून एक वैश्यपुत्र बरोबर घेऊन परत आला. साधूनें सर्व गुणांनीं युक्त व सुंदर अशा त्या वैश्यपुत्रास पाहून ॥ १९॥

नंतर त्या साधु वाण्यानें आपल्या ज्ञातीचे लोक व बंधुजन यांसहित अत्यानंदानें त्यास विधियुक्त आपल्या कन्येचें दान केलें ॥ २० ॥ दुर्दैवानें त्या कन्येच्या विवाहसमयींही त्या साधु वाण्यास पूर्वी केलेल्या नवसाचें विस्मरण झालें; व त्यामुळें त्याजवर भगवान् सत्यनारायण रुष्ट झाले ॥ २१॥ पुढें कांहीं दिवसांनीं प्रेरणा केलेला व्यापारांत परम कुशल

ज्ञातिभिर्बंधुभिःसार्धंपरितुष्टेनचेतसा ॥ दत्तवान्साधुःपुत्रायकन्यांविधि विधानतः ॥ २० ॥ ततोऽभाग्यवशात्तेनविस्मृतंव्रतमुत्तमम् ॥ विवाहसमयेतस्यास्तेनरुष्टोऽभवत्प्रभुः ॥ २१ ॥ ततःकालेननियतोनिजकर्मविशारदः ॥ वाणिज्यार्थंगतःशीघ्रंजामातृसहितोवणिक् ॥ २२ ॥ रत्नसारपुरेरम्येगत्वासिंधुसमीपतः ॥ वाणिज्यमकरोत्साधुर्जामात्राश्रीमतासह ॥ २३ ॥ ॥ ॥ ॥

असा तो साधु वाणी आपल्या जांवयासह व्यापाराकरितां सत्वर निघाला ॥ २२ ॥ पुढें सिंधूच्या जवळच सुंदर अशा रत्नसार नगरांत जाऊन तो साधु आपल्या श्रीमंत जांवयासहवर्तमान व्यापार करूं लागला ॥ २३ ॥

याप्रमाणें ते दोघे चंद्रकेतु राजाच्या सुंदर नगरांत जाऊन व्यापार करीत आहेत तोंच सत्यनारायण प्रभु ॥ २४ ॥ हा वैश्य पूर्वसंकल्पापासून भ्रष्ट आहे असें पाहून त्या साधूप्रत शाप देते झाले कीं, या वैश्यास भयंकर व कठिण असें मोठें दुःख प्राप्त होवो ॥ २५ ॥ असा सत्यनारायणाचा शाप झाल्यानंतर एके दिवशीं चोरानें त्या चंद्रकेतु राजाचें कांहीं

तौगतौनगरेरम्येचंद्रकेतोर्नृपस्यच ॥ एतस्मिन्नेवकालेतुसत्यनारायणः
प्रभुः ॥२४॥ भ्रष्टप्रतिज्ञमालोक्यशापंतस्मैप्रदत्तवान् ॥ दारुणंकठिनंचा
स्यमहद्दुःखंभविष्यति ॥२५॥ एकस्मिन्दिवसेराज्ञोधनमादायतस्करः ॥
तत्रैवचागतश्चोरोवणिजौयत्रसंस्थितौ ॥ २६ ॥ तत्पश्चाद्धावकान्दूता
न्दृष्ट्वाभीतेनचेतसा ॥ धनंसंस्थाप्यतत्रैवसतुशीघ्रमलक्षितः ॥ २७ ॥

द्रव्य चोरिलें आणि ज्या ठिकाणीं ते दोघे वाणी रहात होते त्या ठिकाणीं तो प्राप्त झाला ॥ २६ ॥ तो चोर आपल्या मागें क्रूर असे राजदूत आपणास धरण्यासाठीं धांवत येत आहेत असें पाहून जवळ असलेलें द्रव्य त्या साधु वाण्याच्या येथेंच टाकून मोठ्या भयानें तेथून न कळतां पळून गेला ॥ २७ ॥

नंतर जेथें तो साधु वाणी रहात होता तेथें ते राजदूत धांवत आले आणि पहातात तों चोरीस गेलेलें राजाचें द्रव्य तेथें पडलेलें पाहून व हेच चोर खरे असें मानून त्या वणिक्पुत्रांस बांधून॥२८॥ मोठ्या हर्षानें राजासमीप धांवत आले आणि सांगते झाले कीं, हे प्रभो! आपलें द्रव्य ज्यांनीं चोरिलें ते हे दोन चोर आह्मीं आपणाजवळ पकडून आणिले आहेत. ह्यांस पाहून आज्ञा करावी

ततोदूताःसमायातायत्रास्तेसज्जनोवणिक् ॥ दृष्ट्वानृपधनंतत्रबध्वानीतौ वणिक्सुतौ ॥ २८ ॥ हर्षेणधावमानाश्चऊचुर्नृपसमीपतः ॥ तस्करौद्वौस मानीतौविलोक्याज्ञापयप्रभो ॥ २९ ॥ राज्ञाज्ञप्तास्ततःशीघ्रंदृढंबद्धातुता वुभौ ॥ स्थापितौद्वौमहादुर्गेकारागारेऽविचारतः ॥ ३० ॥ माययासत्यदेवस्यनश्रुतंकैस्तयोर्वचः ॥ अतस्तयोर्धनंराज्ञागृहीतंचंद्रकेतुना ॥ ३१ ॥

॥२९॥ नंतर राजानें विचार न करितां आज्ञा केल्याबरोबर त्या दूतांनीं त्वरित त्या दोघांस बळकट श्रृंखलांनीं ठोकून मोठ्या किल्ल्यावरील कारागृहांत टाकिलें ॥ ३० ॥ त्या काळीं ते वैश्य आह्मीं चोर नव्हे असें ह्मणत असतांही सत्यदेवाच्या मायेनें त्यांचें भाषण कोणींच ऐकिलें नाहीं, देवाची अवकृपा झाली ह्मणून चंद्रकेतु राजानें त्यांचें सर्व द्रव्यही हरण केलें ॥ ३१ ॥

तसेंच सत्यदेवाच्या शापामुळेंच त्या साधु वाण्याच्या स्त्रीसही घरीं अत्यंत दुःख प्राप्त झालें; कारण कीं, घरांत जें द्रव्य होतें तें सर्व चोरांनीं नेलें ॥ ३२ ॥ तेव्हांपासून आधि व व्याधि यांहीं व्याप्त होऊन क्षुधा व तृषा ह्यांनीं दुःखित झालेली व आपणास अन्न कसें मिळेल अशा चिंतेंत पडलेली प्रत्येक घरीं ती भिक्षार्थ फिरूं लागली. तशीच तिची कलावती नामक

तच्छापाच्चतयोर्गेहेभार्याचैवातिदुःखिता ॥ चोरेणापहृतंसर्वंगृहेयच्चस्थितंधनम् ॥ ३२ ॥ आधिव्याधिसमायुक्ताक्षुत्पिपासातिदुःखिता ॥ अन्नचिंतापराभूत्वाबभ्रामचगृहेगृहे ॥ कलावतीतुकन्यापिबभ्रामप्रतिवासरम् ॥ ३३ ॥ एकस्मिन्दिवसेजाताक्षुधार्ताद्विजमंदिरम् ॥ गत्वापश्यद्व्रतंतत्रसत्यनारायणस्यच ॥३४॥ उपविश्यकथांश्रुत्वावरंप्रार्थितवत्यपि ॥ प्रसादभक्षणंकृत्वाययौरात्रौगृहंप्रति ॥ ३५ ॥ ॥ ॥

कन्याही अन्नाकरितां नित्य फिरत असे ॥ ३३ ॥ एके दिवशीं ती कलावती कन्या क्षुधेनें पीडित होत्साती एका ब्राह्मणाचे घरीं गेली, तेथें सत्यनारायणाचें व्रत चाललें आहे असें पाहून ॥३४॥ ती तेथें बसली. नंतर कथा श्रवण करून आणि प्रसाद भक्षण करून, तसेंच

आपलें दुःख निवारणार्थ सत्यनारायणाची प्रार्थना करून रात्रींच घरीं आली ॥३५॥ तेव्हां मातेनें कलावतीस प्रेमानें विचारिलें कीं, मुली, एवढा वेळपर्यंत तूं कोठें होतीस? तुझ्या मनांत काय आहे? ॥ ३६ ॥ तें ऐकून कलावती आईला सांगूं लागली,? मीं एका ब्राह्मणाचें घरीं इच्छित मनोरथ पूर्ण करणारें असें व्रत पाहिलें ॥ ३७ ॥ या प्रकारें कन्येचें भाषण ऐकून ती

माताकलावतींकन्यांकथयामासप्रेमतः ॥ पुत्रिरात्रौस्थिताकुत्रकिंतेमनसिवर्तते ॥ ३६ ॥ कन्याकलावतीप्राहमातरंप्रतिसत्वरम् ॥ द्विजालयेव्रतंमातर्दृष्टंवांछितसिद्धिदम् ॥ ३७ ॥ तच्छ्रुत्वाकन्यकावाक्यंव्रतंकर्तुंसमुद्यता ॥ सामुदातुवणिग्भार्यासत्यनारायणस्यच ॥३८॥ व्रतंचक्रेसैवसाध्वीबंधुभिःस्वजनैःसह ॥ भर्तृजामातरौक्षिप्रमागच्छेतांस्वमाश्रमम् ॥ ३९ ॥

साधु वाण्याची स्त्री लीलावती आनंदित होत्साती सत्यनारायणाचें व्रत करण्याविषयीं तयार झाली ॥३८॥ ती पतिव्रता वैश्यस्त्री आपले बंधु व स्वजन ह्यांसहवर्तमान भक्तीनें पति व जांवई हे दोघे सुखरूप व लौकर घरीं येवोत अशा संकल्पानें सत्यनारायणाचें व्रत करिती झाली ॥३९॥

हे देवा! माझ्या पतीचे आणि जांवयाचे सर्व अपराध क्षमा करण्याविषयीं तूं योग्य आहेस, अशी तिनें सत्यनारायणाची प्रार्थना केली तेव्हां सत्यनारायण प्रभु त्या व्रतविधीनें संतुष्ट झाले ॥४०॥ आणि चंद्रकेतु राजाच्या स्वप्नांत जाऊन सांगते झाले कीं, हे राजश्रेष्ठा! दोन वैश्य जे तूं बंदिखान्यांत टाकिले आहेस ते प्रातःकाळीं सोडून दे ॥ ४१ ॥ तूं जें त्यांचें

अपराधंचमेभर्तुर्जामातुःक्षंतुमर्हसि ॥ व्रतेनानेनतुष्टोऽसौसत्यनारायणः प्रभुः ॥४०॥ दर्शयामासस्वप्नंहिचंद्रकेतुंनृपोत्तमम् ॥ बंदिनौमोचयप्रात र्वणिजौनृपसत्तम ॥ ४१ ॥ देयंधनंचतत्सर्वंगृहीतंयत्त्वयाऽधुना ॥ नोचे त्वांनाशयिष्यामिसराज्यधनपुत्रकम् ॥ ४२ ॥ एवमाभाष्यराजानंध्या नगम्योऽभवत्प्रभुः ॥ ततःप्रभातसमयेराजाचस्वजनैःसह ॥ ४३ ॥ ॥

धन घेतलें आहेस तें सर्व सांप्रतकाळीं त्यांचें त्यास दे. जर असें न करशील तर राज्य, धन आणि पुत्र यांसह तुझा नाश करीन ॥ ४२ ॥ याप्रमाणें राजास सांगून सत्यनारायण प्रभु अदृश्य झाले. नंतर प्रातःकाळीं राजा आपले स्वजनांसहवर्तमान ॥ ४३ ॥

सभेंत बसून रात्रीं पाहिलेलें स्वप्न त्यांस सांगून ह्मणाला कीं, जे मोठे दोन वैश्यपुत्र आपण कारागृहांत टाकिले आहेत त्यांस लवकर सोडून द्या ॥ ४४ ॥ अशी राजाची आज्ञा ऐकून दूत त्या वैश्यांच्या बेड्या काढून त्यांस राजासमोर घेऊन आले आणि हात जोडून नम्रतेनें ह्मणाले॥४५॥महाराज? आपल्या आज्ञेप्रमाणें कारांगृहातून हे दोन्ही वैश्यपुत्र आणिले आहेत.

उपविश्यसभामध्येप्राहस्वप्नंजनंप्रति ॥ बद्धौमहाजनौशीघ्रंमोचयद्वौव णिक्सुतौ ॥ ४४ ॥ इतिराज्ञोवचःश्रुत्वामोचयित्वामहाजनौ ॥ समा नीयनृपस्याग्रेप्राहुस्तेविनयान्विताः ॥ ४५ ॥ आनीतौद्वौवणिक्पुत्रौ मुक्तौनिगडबंधनात् ॥ ततोमहाजनौनत्वाचंद्रकेतुंनृपोत्तमम् ॥ ४६ ॥ स्मरंतौपूर्ववृत्तांतंनोचतुर्भयविह्वलौ ॥ राजावणिक्सुतौवीक्ष्यवचःप्रोवा चसादरम् ॥ ४७ ॥ ॥ ॥ ॥

नंतर त्या उभयतां वैश्यांनीं नृपश्रेष्ठ चंद्रकेतु राजास नमस्कार केला ॥ ४६ ॥ नंतर पूर्वीं घडलेल्या वृत्तांताचें स्मरण होऊन भयानें विव्हल झाल्यामुळें त्यांनीं कांहींच भाषण केलें नाहीं, नंतर राजा त्या वैश्यपुत्रांस पाहून आदरपूर्वक भाषण करूं लागला ॥ ४७ ॥

वैश्य हो, तुह्मांस केवळ तुमच्या दैवानेंच हें मोठें दुःख प्राप्त झालें, आतां तुह्मांस कांहीं भय नाहीं तुह्मी बंधमुक्त आहां असें बोलून राजा त्यांच्या बेड्या काढवून क्षौरकर्म व मंगलस्नानादि करविता झाला ॥४८॥ तसेंच त्यांस वस्त्रें व अलंकार देऊन अग्रभागीं बसवून राजानें नम्र भाषणानें त्यांस अत्यंत संतुष्ट केलें ॥ ४९ ॥ नंतर जें त्या वैश्यांचें द्रव्य पूर्वीं हरण केलें होतें तें

दैवात्प्राप्तंमहद्दुःखमिदानींनास्तिवैभयम् ॥ तदानिगडसंत्यागंक्षौरकर्माद्यकारयत ॥ ४८ ॥ वस्त्रालंकारकंदत्त्वापरितोष्यनृपश्चतौ ॥ पुरस्कृत्यवणिक्पुत्रौवचसातोषयद्भृशम् ॥ ४९ ॥ पुरानीतंतुयद्द्रव्यंद्विगुणीकृत्यदत्तवान् ॥ प्रोवाचतौततोराजागच्छसाधोनिजाश्रमम् ॥ ५० ॥ राजानंप्रणिपत्याहगंतव्यंत्वत्प्रसादतः ॥ ५१ ॥ ॥ इतिश्रीस्कंदपुराणेरेवाखंडेसत्यनारायणव्रतकथायांतृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥ ॥

दुप्पट करून त्यांस दिलें आणि सांगितलें कीं, हे साधो, आतां आपण आपल्या घरीं जावें ॥ ५० ॥ तेव्हा ते वैश्य राजास साष्टांग नमस्कार करून ह्मणाले—हे प्रभो ! आपल्या प्रसादेंकरून आतां आह्मी गमन करितों ॥ ५१ ॥ ॥ इति श्रीस० रेवा० तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

सूत सांगतात—हे ऋषी हो, त्या कालीं तो साधु वाणी आपणास मार्गांत कांहीं विघ्नें न यावीं ह्मणून ब्राह्मणांकडून आशीर्वाद घेऊन व त्यांस दक्षिणा देऊन जांवयासहवर्तमान स्वनगरास जाण्याकरितां निघाला ॥१॥ तो तेथून बराच दूर गेल्यावर सत्यनारायणप्रभु (संन्याशाचा वेष धारण करून) येऊन त्याची परीक्षा करण्याकरितां त्यास ह्मणाले, हे साधो,

सूतउवाच ॥ यात्रांतुकृतवान्साधुर्मंगलायनपूर्विकाम् ॥ ब्राह्मणायधनंदत्वातदातुनगरंययौ ॥ १ ॥ कियद्दूरेगतेसाधौसत्यनारायणःप्रभुः ॥ जिज्ञासांकृतवान्साधोकिमस्तितवनौस्थितम् ॥ २॥ ततोमहाजनौमत्तौहेलयाचप्रहस्यवै ॥ कथंपृच्छसिभोदंडिन्मुद्रांनेतुंकिमिच्छसि ॥ ३ ॥ लतापत्रादिकंचैववर्ततेतरणौमम ॥ निष्ठुरंचवचःश्रुत्वासत्यंभवतुतेवचः ॥४॥

ह्या तुझ्या नौकेंत काय भरलें आहे? ॥२॥ असा त्या यतीचा प्रश्न ऐकून द्रव्यानें उन्मत्त झालेले ते वाणी त्याची हेलना करून हंसून ह्मणाले कीं, हे संन्यासीबुवा, तुह्मी कशाकरितां विचारितां? तुमच्या मनांत आमचें द्रव्य नेण्याची इच्छा आहे काय! ॥ ३ ॥ आमच्या ह्या नावेंत वेली, पानें इत्यादि जिन्नस भरले आहेत. असें त्या वैश्याचें निष्ठुर भाषण

ऐकून यतिवेषधारी प्रभु ह्मणाले, हेंच तुमचें भाषण सत्य होवो ॥ ४ ॥ असें बोलून ते यतिवेषधारी प्रभु त्यांच्या जवळून लागलेच निघून गेले आणि तेथून कांहीं दूर जाऊन समुद्राचे समीपच उभे राहिले ॥ ५ ॥ तेथून यती गेल्यानंतर तो साधु वाणी आपलें स्नानादि नित्यकर्म करूं लागला. तों हलकी झाल्यामुळें पाण्यांतून वर आलेल्या त्या

एवमुक्त्वागतःशीघ्रंदंडीतस्यसमीपतः ॥ कियद्दूरेततोगत्वास्थितःसिंधु समीपतः ॥५॥ गतेदंडिनिसाधुश्चकृतनित्यक्रियस्तदा ॥ उत्थितांतरणीं दृष्ट्वाविस्मयंपरमंययौ ॥ ६ ॥ दृष्ट्वालतादिकंचैवमूर्च्छितोन्यपतद्भुवि ॥ लब्धसंज्ञोवणिक्पुत्रस्ततश्चिंतान्वितोऽभवत् ॥ ७ ॥ तदातुदुहितुःकांतो वचनंचेदमब्रवीत् ॥ किमर्थंक्रियतेशोकःशापोदत्तश्चदंडिना ॥८॥ ॥

नौकेकडे पाहून परम विस्मय पावता झाला ॥ ६ ॥ नौकेंत सर्व लतापत्रादि जिन्नस पाहून तत्काल त्याला मूर्च्छा येऊन तो भूमीवर पडला. नंतर कांहीं वेळानें तो वैश्य वैश्यपुत्र सावध झाला, तेव्हां चिंताक्रांत झाला ॥७॥ त्या काळीं त्याचा जांवई ह्मणूं लागला, साधो ? आपण कशाकरितां शोक करितां ! आपणास त्या यतीनें शाप दिला, त्यामुळें असें झालें ॥ ८॥

यावरून तो यती पाहिजे तें करण्यास समर्थ आहे यात संशय नाहीं, त्याकरितां आपण त्यास शरण जाऊं; ह्मणजे आपणास इष्ट फळ प्राप्त होईल ॥ ९ ॥ असें जांवयाचें भाषण ऐकून तो साधु वाणी त्या दंडीच्या समीप गेला आणि त्यास पाहून मोठ्या भक्तीनें नमस्कार करून आदरानें बोलूं लागला ॥ १० ॥ हे स्वामिन्, मीं आपल्याजवळ असत्य भाषण केलें त्या अपरा-

शक्यतेतेनसर्वंहिकर्तुंचात्रनसंशयः॥ अतस्तच्छरणंयामोवांछितार्थोभविष्यति ॥९॥ जामातुर्वचनंश्रुत्वातत्सकाशंगतस्तदा ॥ दृष्ट्वाचदंडिनंभक्त्या नत्वाप्रोवाचसादरम् ॥१०॥ क्षमस्वचापराधंमेयदुक्तंतवसंनिधौ ॥ एवंपुनःपुनर्नत्वामहाशोकाकुलोऽभवत् ॥ ११ ॥ प्रोवाचवचनंदंडीविलपंतंविलोक्यच ॥ मारोदीःश्रृणुमद्वाक्यंममपूजाबहिर्मुखः ॥१२॥ ममाज्ञयाचदुर्बुद्धेलब्धंदुःखंमुहुर्मुहुः॥तच्छ्रुत्वाभगवद्वाक्यंस्तुतिंकर्तुंसमुद्यतः ॥ १३ ॥

धाची मला क्षमा करा. असें बोलून व वारंवार नमस्कार करून तो साधु मोठ्या शोकानें व्याप्त झाला ॥११॥ याप्रमाणें तो साधु वाणी शोक करीत आहे असें पाहून ते यतिवेषधारी प्रभु ह्मणतात हे दुर्बुद्धे! तूं शोक करूं नको. मी सांगतों तें ऐक. अरे तूं माझ्या पूजनाविषयीं

पराङ्मुख झाला आहेस; ह्मणून माझ्याच आज्ञेनें तुला वारंवार दुःख प्राप्त झालें. भगवंताचें या प्रकारचें भाषण श्रवण करून तो साधु वाणी त्याची स्तुति करूं लागला ॥१२॥१३॥ तों ह्मणाला हे देवा! तुमच्या मायेनें ब्रह्मादिक सर्व देव मोहित होऊन आपले गुण व रूप यांस जाणत नाहींत हें आश्चर्य आहे ॥१४॥ मी तर परममूर्ख तुमच्या मायेनें मोहित असल्यामुळें तुह्मास कसा

साधुरुवाच ॥ त्वन्मायामोहिताःसर्वेब्रह्माद्यास्त्रिदिवौकसः ॥ नजानंति गुणान्रूपंतवाश्चर्यमिदंप्रभो ॥१४॥ मूढोऽहंत्वांकथंजानेमोहितस्तवमायया ॥ प्रसीदपूजयिष्यामियथाविभवविस्तरैः ॥१५॥ पुरावित्तंचतत्सर्वंत्राहिमांशरणागतम् ॥श्रुत्वाभक्तियुतंवाक्यंपरितुष्टोजनार्दनः॥१६॥वरंचवाछितंदत्त्वातत्रैवांतर्दधेहरिः॥ततोनावंसमारुह्यदृष्ट्वावित्तप्रपूरिताम्॥१७॥

जाणेन? आपण मला प्रसन्न व्हा, आतां मी माझ्या ऐश्वर्यानुरूप आपलें पूजन करीन ॥१५॥ पूर्वीं जें माझें द्रव्य होतें तें सर्व मला प्राप्त व्हावें; मी आपणास शरण आलों आहें, माझें रक्षण व्हावें. असें त्या साधु वैश्याचें भक्तियुक्त भाषण ऐकून जनार्दन संतुष्ट झाले॥१६॥ आणि त्यास इच्छित वर देऊन सत्यनारायणप्रभु तेथेंच गुप्त झाले. नंतर तो साधुवाणी आपल्या नौकेवर चढून ती

॥१९॥

द्रव्यानें पूर्ववत् परिपूर्ण आहे असें पाहून ॥१७॥ ह्मणूं लागला कीं सत्यनारायणाचे कृपेनें माझे मनोरथ सफल झाले, असें भाषण करून तो साधु स्वजनांसहवर्तमान यथाविधि सत्यनारायणाचें पूजन करून ॥१८॥ सत्यदेवाच्या प्रसादानें तो हर्षानें परिपूर्ण झाला, नंतर यत्नानें नौका लोटून स्वदेशास गेला ॥१९॥ तो साधु स्वनगराजवळ आल्यावर जांवयास ह्मणतो ही माझी

कृपयासत्यदेवस्यसफलंवांछितंमम ॥इत्युक्त्वास्वजनैःसार्धंपूजांकृत्वायथा विधि ॥१८॥ हर्षेणचाभवत्पूर्णःसत्यदेवप्रसादतः ॥ नावंसंयोज्ययत्नेनस्व देशगमनंकृतम् ॥ १९ ॥ साधुर्जामातरंप्राहपश्यरत्नपुरींमम ॥ दूतंचप्रेष यामासनिजवित्तस्यरक्षकम् ॥ २० ॥ दूतोऽसौनगरंगत्वासाधुभार्यांविलो क्यच ॥ प्रोवाचवांछितंवाक्यंनत्वाबद्धांजलिस्तदा ॥२१॥ निकटेनगरस्यै वजामात्रासहितोवणिक् ॥ आगतोबंधुवर्गैश्चवित्तैश्चबहुभिर्युतः ॥ २२ ॥

रत्नपुरी पहा. नंतर त्यानें द्रव्याचें रक्षण करणारा दूत घरीं पाठविला ॥२०॥ तो तत्काळ नगरांत जाऊन साधूच्या स्त्रीस पाहून, हात जोडून, तिला नमस्कार करून ह्मणाला ॥२१॥ अहो, नगराच्या सन्निध जामात व बंधुवर्ग यांसहवर्तमान साधु वैश्य बहुत द्रव्य घेऊन आले आहेत॥२२॥

या प्रकारचें दूताचें भाषण ऐकून त्या साध्वीला मोठा आनंद झाला. नंतर ती सत्यनारायणाची पूजा करून कन्येस ह्मणाली ॥२३॥ मुली, मी पतीच्या दर्शनास पुढें जातें, तूंही लवकर ये. असें मातेचें भाषण ऐकून तिनेंही व्रत करून त्याची समाप्ति केली ॥ २४ ॥ परंतु प्रसाद

श्रुत्वादूतमुखाद्वाक्यंमहाहर्षवतीसती ॥ सत्यपूजांततःकृत्वाप्रोवाचतनुजांप्रति ॥२३॥ व्रजामिशीघ्रमागच्छसाधुसंदर्शनायच ॥ इतिमातृवचःश्रुत्वाव्रतंकृत्वासमाप्यच ॥ २४ ॥ प्रसादंचपरित्यज्यगतासापिपतिंप्रति ॥ तेनरुष्टःसत्यदेवोभर्तारंतरणींतथा॥२५॥ संहृत्यचधनैःसार्धंजलेतस्यावमज्जयत् ॥ ततःकलावतीकन्यानविलोक्यनिजंपतिम् ॥ २६ ॥ शोकेनमहतातत्ररुदतीचापतद्भुवि॥दृष्ट्वातथाविधांनावंकन्यांचबहुदुःखिताम् ॥२७॥

भक्षण न करितां तीही पतिदर्शनार्थ गेली. त्यामुळें सत्यनारायण क्रुद्ध होऊन द्रव्य व कन्येचा पति यांसह ती नौका उदकांत बुडविते झाले, पुढें ती कलावती कन्या आपल्या पतीस न पाहिल्यामुळें ॥२५॥२६॥ मोठ्या शोकानें युक्त होऊन रुदन करितां करितां भूमीवर पडली.

त्या काळीं जांवयासह द्रव्यानें भरलेली नौका बुडाल्यामुळें कन्या बहुत दुःखित झाली असें पाहून साधु व ते सर्व नावाडी भयभीत अंतःकरणानें हें काय आश्चर्य झालें असें ह्मणून विचारांत पडले ॥ २७॥ २८ ॥ नंतर लीलावती कन्येस पाहून अति व्याकुळ झाली आणि मोठ्यानें आक्रोश करून पतीस ह्मणाली ॥ २९ ॥ अहो, इतक्यांत नौकेसहित कलावतीचा

भीतेनमनसासाधुःकिमाश्चर्यमिदंभवेत् ॥ चिंत्यमानाश्चतेसर्वेबभूवुस्तरि वाहकाः ॥ २८ ॥ ततोलीलावतीकन्यांदृष्ट्वासाविह्वलाभवत् ॥ विलला पातिदुःखेनभर्तारंचेदमब्रवीत् ॥ २९ ॥ इदानींनौकयासार्धंकथंसोऽभूद लक्षितः ॥ नजानेकस्यदेवस्यहेलयाचैवसाहृता ॥ ३० ॥ सत्यदेवस्यमा हात्म्यंज्ञातुंवाकेनशक्यते॥ इत्युक्त्वाविललापैवततश्चस्वजनैःसह ॥ ३१ ॥

पति कसा अदृश्य झाला? हें कृत्य कोणत्या देवाच्या अवकृपेनें झालें तें मला समजत नाहीं ॥३०॥ सत्यदेवाचें माहात्म्य जाणण्याविषयीं कोण समर्थ आहे? ( त्याच्याच क्रोधामुळें हें असें घडलें नसेलना? ) असें बोलून स्वजनांसह ती विलाप करूं लागली ॥ ३१ ॥

नंतर ती लीलावती कन्येस पोटाशीं धरून रुदन करूं लागली. नंतर कलावतीनें पति नष्ट झाल्यामुळें अत्यंत दुःखित होऊन ॥ ३२ ॥ त्याच्या पादुका घेऊन त्यांसह सती जाण्याचा निश्चय केला. या प्रकारें कन्येचें चरित्र पाहून तो धर्मज्ञ वैश्य स्वस्त्रीसहवर्तमान ॥ ३३ ॥ शोकानें अति संतप्त होऊन विचार करूं लागला—हें नौकाहरण सत्यनारायणानें केलें

ततोलीलावतीकन्यांक्रोडेकृत्वारुरोदह ॥ ततःकलावतीकन्यानष्टेस्वामि निदुःखिता ॥ ३२ ॥ गृहीत्वापादुकांतस्यानुगंतुंचमनोदधे ॥ कन्याया श्चरितंदृष्ट्वासभार्यःसजनोवणिक् ॥ ३३ ॥ अतिशोकेनसंतप्तश्चिंतयामास धर्मवित् ॥ हृतंवासत्यदेवेनभ्रांतोऽहंसत्यमायया ॥ ३४ ॥ सत्यपूजांकरि ष्यामियथाविभवविस्तरैः॥इतिसर्वान्समाहूयकथयित्वामनोरथम् ॥३५॥

असेल काय? मी सत्यदेवाच्या मायेनें भ्रांत झालों आहें ॥ ३४ ॥ नंतर सर्वांस बोलावून त्यांच्या समक्ष आपला मनोरथ प्रकट करून तो ह्मणाला—मीं आपल्या ऐश्वर्यानुरूप सत्यनारायणाची पूजा निश्चयानें करीन ॥ ३५ ॥ ॥ ॥

अशी प्रार्थना करून त्यानें सत्यनारायणास पुनः पुनः साष्टांग नमस्कार घातले. तेव्हा दीनाचें परिपालन करणारे सत्यदेव संतुष्ट झाले ॥३६॥ भक्तवत्सल नारायण दयार्द्र होऊन आकाशवाणीनें बोलले कीं, हे वैश्या! तुझी कन्या माझ्या प्रसादाचा त्याग करून आपल्या

नत्वाचदंडवद्भूमौसत्यदेवंपुनःपुनः ॥ ततस्तुष्टःसत्यदेवोदीनानापरिपालकः ॥ ३६ ॥ जगादवचनंचैनंकृपयाभक्तवत्सलः ॥ त्यक्त्वाप्रसादंते कन्यापतिंद्रष्टुंसमागता ॥ ३७ ॥ अतोऽदृष्टोऽभवत्तस्याःकन्यकायाः पतिर्ध्रुवम् ॥ गृहंगत्वाप्रसादंचभुक्त्वासायातिचेत्पुनः ॥ ३८ ॥ लब्धभर्त्रीसुतासाधोभविष्यतिनसंशयः ॥ कन्यकाताद‍ृशंवाक्यंश्रुत्वागगनमंडलात् ॥ ३९ ॥ ॥ ॥ ॥

पतीस पहाण्याकरितां आली ॥३७॥ ह्मणूनच या तुझ्या कन्येचा पति अदृश्य झाला आहे हें खरें आहे, यास्तव जर ही घरीं जाऊन प्रसाद भक्षण करून पुनः येईल तर ॥ ३८ ॥ ही कन्या आपल्या भर्त्याप्रत पावेल यांत संशय नाहीं. कलावतीनें ती आकाशवाणी ऐकून

॥ ३९ ॥ त्वरेनें घरीं जाऊन प्रसाद भक्षण केला आणि परत तेथें येऊन पहाते तों जनां-सहवर्तमान तिचा पति तिच्या दृष्टीस पडला ॥ ४० ॥ तेव्हां ती कलावती कन्या मोठ्या आनंदानें पित्यास ह्मणाली कीं, बाबा! आतां घरीं चला. उशीर कां करितां? ॥ ४१ ॥ कन्येचें असें भाषण ऐकून त्या वैश्यास मोठा आनंद झाला. नंतर यथाविधि सत्यना-

क्षिप्रंतदागृहंगत्वाप्रसादंचबुभोजसा ॥ सापश्चात्पुनरागत्यददर्शसजनं पतिम् ॥ ४० ॥ ततःकलावतीकन्याजगादपितरंप्रति ॥ इदानींचगृहं याहिविलंबंकुरुषेकथम् ॥ ४१ ॥ तच्छ्रुत्वाकन्यकावाक्यंसंतुष्टोऽभूद्वणिक्सुतः ॥ पूजनंसत्यदेवस्यकृत्वाविधिविधानतः ॥४२॥ धनैर्बंधुगणैःसार्धं जगामनिजमंदिरम् ॥ पौर्णमास्यांचसंक्रांतौकृतवान्सत्यपूजनम् ॥ ४३ ॥

रायणाचें तेथेंच पूजन करून ॥ ४२ ॥ आपले बंधुजन व धन यांसहवर्तमान तो साधु वाणी आपल्या घरीं गेला. पुढें प्रतिमासीं पौर्णिमा व संक्रांति ह्या पर्वकाळीं सत्यनारा-यणाचें पूजन करूं लागला ॥ ४३ ॥

ह्या प्रकारें मोठ्या भक्तीनें विधियुक्त सत्यनारायणाचें व्रत आचरण करून तो मृत्युलोकीं सुख भोगून अंतीं सत्यपुरास जाता झाला ॥ ४४ ॥ ॥ इति श्रीसत्यनारायणे रेवाखंडे चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ ॥ सूत ह्मणतात—ऋषी हो, आणखी दुसरी एक कथा सांगतों श्रवण करा. पूर्वीं कोणी एक अंगध्वज नामक राजा प्रजापालन करण्याविषयीं फार

इहलोकेसुखंभुक्त्वाचांतेसत्यपुरंययौ ॥ ४४ ॥ ॥ इतिश्रीस्कंदपुराणे रेवाखंडेसत्यनारायणकथायांचतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ सूतउवाच ॥ ॥ अथान्यच्चप्रवक्ष्यामिश्रृणुध्वंमुनिसत्तमाः ॥ आसीत्त्वंगध्वजोराजाप्रजापालनतत्परः ॥ १ ॥ प्रसादंसत्यदेवस्यत्यक्त्वादुःखमवापसः ॥ एकदासवनंगत्वाहत्वाबहुविधान्पशून् ॥ २ ॥ ॥ ॥ ॥

तत्पर होता ॥ १ ॥ त्या राजाला सत्यनारायणाच्या प्रसादाचा त्याग केल्यामुळें अतिशय दुःख प्राप्त झालें. एके समयीं तो राजा अरण्यांत जाऊन सिंह व्याघ्रादि अनेक प्रकारचे पशू मारून ॥ २ ॥

एका वटवृक्षासमीप आला, तेथें गोपाल लोक आपल्या बंधुजनासह संतुष्ट होत्साते भक्तियुक्त अंतःकरणानें सत्यनारायणाचें पूजन करीत होते ते त्याच्या दृष्टीस पडले ॥ ३ ॥ राजा हें सर्व पाहूनही गर्वानें तेथें गेला नाहीं. गेला नाहीं इतकेंच नव्हे, सत्यनारायणास नमस्कारही केला नाहीं. तथापि सर्व गोपगण सत्यनारायणाचा प्रसाद राजापुढें ठेवून

आगत्यवटमूलंचदृष्ट्वासत्यस्यपूजनम् ॥ गोपाःकुर्वंतिसंतुष्टाभक्तियुक्ताःस बांधवाः ॥३॥ राजादृष्ट्वातुदर्पेणनगत्वातंननामसः ॥ ततोगोपगणाःसर्वे प्रसादंनृपसंनिधौ ॥ ४ ॥ संस्थाप्यपुनरागत्यभुक्त्वासर्वैयथेप्सितम् ॥ ततःप्रसादंसंत्यज्यराजादुःखमवापसः ॥ ५ ॥ तस्यपुत्रशतंनष्टंधनधान्यादिकंचयत् ॥ सत्यदेवेनतत्सर्वंनाशितंममनिश्चितम् ॥ ६ ॥ ॥

पूर्वस्थळीं येऊन यथेच्छ प्रसाद भक्षण करून आनंद पावते झाले, प्रसादाचा त्याग केल्यामुळें तो राजा फार दुःख पावता झाला ॥ ४ ॥ ५ ॥ त्या राजाचे शंभर पुत्र एकाएकीं नाहींसे झाले व धनधान्यादि जें सर्व होतें तें नाश पावलें, तेव्हां त्याला वाटलें कीं, खरोखर माझें हें सर्व सत्यदेवानें नष्ट केलें असावें ॥ ६ ॥ ॥ ॥ ॥

आतां मी जेथें पूर्वीं सत्यदेवाचें पूजन झालें होतें तेथें पुनः जातों, असा मनांत निश्चय करून गोपालांचे समीप गेला ॥७॥ नंतर राजानें भक्ति आणि श्रद्धा ह्यांनीं युक्त होऊन गोपगणांसह वर्तमान सत्यनारायणाचें यथाविधि पूजन केलें ॥८॥ तो राजा सत्यदेवाच्या प्रसादानें धनपुत्रादि ऐश्वर्यानें युक्त होऊन इहलोकीं सुख भोगून अंतीं वैकुंठास गमन करिता झाला ॥ ९ ॥

अतस्तत्रैवगच्छामियत्रदेवस्यपूजनम् ॥ मनसातुविनिश्चित्यययौगोपाल सन्निधौ ॥७॥ ततोऽसौसत्यदेवस्यपूजांगोपगणैःसह ॥ भक्तिश्रद्धान्वि तोभूत्वाचकारविधिनानृपः ॥ ८ ॥ सत्यदेवप्रसादेनधनपुत्रान्वितोऽभव त् ॥ इहलोकेसुखंभुक्त्वाचांतेसत्यपुरंययौ ॥९॥ यइदंकुरुतेसत्यव्रतंपरम दुर्लभम् ॥शृणोतिचकथांपुण्यांभक्तियुक्तःफलप्रदाम् ॥१०॥ धनधान्यादि कंतस्यभवेत्सत्यप्रसादतः ॥ दरिद्रोलभतेवित्तंबद्धोमुच्येतबंधनात् ॥११॥

हें परम दुर्लभ सत्यव्रत जो कोणी करितो व भक्तियुक्त अंतःकरणानें ही फलदायक कथा श्रवण करितो ॥ १० ॥ त्यास सत्यनारायणाच्या प्रसादानें धनधान्यादिक प्राप्त होतें, आणि जो दरिद्री असेल त्यास द्रव्यप्राप्ति होते, जो बद्ध असेल तो बंधनापासून मुक्त होतो ॥ ११ ॥

तसेंच जो भीत असेल तो भयापासून मुक्त होतो; आणि इहलोकीं संपूर्ण सुखें भोगून अंतीं वैकुंठास जातो. हें सत्य आहे, यांत संशय नाहीं ॥ १२ ॥ सूत ह्मणतात, हे ऋषीहो, याप्रमाणें सत्यनारायणाचें व्रत मीं तुह्मांस सांगितलें. हें व्रत केलें असतां मनुष्य सर्व दुःखा-

भीतोभयात्प्रमुच्येतसत्यमेवनसंशयः ॥ईप्सितंचफलंभुक्त्वाचांतेसत्यपुरं व्रजेत् ॥१२॥ इतिवःकथितंविप्राःसत्यनारायणव्रतम् ॥ यत्कृत्वासर्वदुःखे भ्योमुक्तोभवतिमानवः ॥ १३ ॥ विशेषतःकलियुगेसत्यपूजाफलप्रदा ॥ केचित्कालंवदिष्यंतिसत्यमीशंतमेवच ॥ १४ ॥ सत्यनारायणंकेचित्सत्य देवंतथापरे ॥ नानारूपधरोभूत्वासर्वेषामीप्सितप्रदः ॥ १५ ॥ ॥

पासून मुक्त होतो ॥ १३ ॥ विशेषेंकरून ह्या कलियुगांत सत्यनारायणाची पूजा फल देणारी आहे, ह्या सत्यनारायणास कोणी काल ह्मणतात, कोणी ईश ॥ १४ ॥ कोणी सत्यनारायण ह्मणतात आणि कोणी सत्यदेव असेंहि ह्मणतात. अशीं नानारूपें धारण करून सर्व भक्तांचे

मनोरथ पूर्ण करणारा असा ॥ १५ ॥ सनातन भगवान् कलियुगात सत्यनारायणव्रतरूपी होईल. हे मुनिसत्तमहो, जो कोणी ही सत्यनारायणव्रतकथा नित्य पठण करितो अथवा

**भविष्यतिकलौसत्यव्रतरूपीसनातनः ॥ यइदंपठतेनित्यंशृणोतिमुनिसत्तमाः ॥ सत्यंनश्यंतिपापानिसत्यदेवप्रसादतः ॥ १६ ॥ ॥ इतिश्रीस्कंदपुराणेरेवाखंडेश्रीसत्यनारायणव्रतकथायांपंचमोऽध्यायः ॥५॥ ॥**

श्रवण करितो त्याचीं सर्व पापें सत्यदेवाच्या प्रसादेंकरून नाश पावतात हें सत्य आहे ॥१६॥ इति श्रीसत्यनारायणे रेवाखंडे पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ श्रीसत्यदेवार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

हें पुस्तक वे. शा. रा. गोविंद शंकरशास्त्री बापट यांनीं तयार केलें तें मुंबईमध्यें “निर्णयसागर” छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांनीं आपल्या छापखान्यांत छापिलें. शके १८३९. सन १९१७.



Published by Tukaram Javaji, Proprietor Niranaya-Sagar Press, 23, Kolbhat Lane, Bombay.

Printed by Ramchandra Yesu Shedge, Nirnaya-Sagar Press, 23, Kolbhat Lane, Bombay.

